

ही गोष्ट एका छोट्या माशाची आहे.

तिचे नाव आर्टी.

ती खूप हुशार होती.



एक दिवस सगळे छोटे मासे एकमेकांच्या जवळ पोहते होते.

सभी छोटी मछलियां एक समय पर सगळे छोटे माशांना एकाच वेळी, एकाच पद्धतीने पोहायचे होते. त्यामुळे सगळेजण एकाच दिशेने पोहत होते.



मग ते दुसऱ्या दिशेला पोहायला लागले.





पण हुशार आर्टीने काय केले? जेव्हा
बाकी मासे एका दिशेत पोहत होते
तेव्हा ती दुसऱ्या दिशेला पोहू लागली.



जेव्हा बाकी मासे दुसऱ्या दिशेला पोहू लागले
तेव्हा ती उलट्या दिशेला पोहू लागली.

लवकरच सगळे मासे
एकमेकांना भेटले.



मग परत मासे दुसऱ्यांदा एका
दिशेला पोहू लागले.



मग उलट्या दिशेने





मग हुशार आर्टी दुसऱ्यांदा आली.
तिने काय केले?
यावेळी ती उलटी पोहू लागली.

हुशार आर्टीच्या चेहऱ्यावर एक
मजेदार हसू होते.



आर्टीचा चेहरा बघून इतर मासे हसू लागले.

बुलू - बुलू - बुलू –हसतांना त्यांच्या तोंडातून हवेचे बुडबुडे निघू लागले.





सगळे मासे दुसऱ्यांदा एकमेंकाना भेटले.



एक दिवस आर्टीला एक मासा रडतांना दिसली.



एक मतलबी म्हातारा खेकडा माशांना रडवत होता. छोट्या माशांना त्या मतलबी खेकड्याची भीती वाटत होती.

पण आर्टी खेकड्यांना घाबरत नसे.





आर्टी, निर्भयतेने खेकड्याजवळ पोहत गेली. त्यावेळी मतलबी म्हातारा खेकडा जेवत होता.

पण म्हाताऱ्या खेकड्याला खूप भूक लागली होती. म्हणून त्याने आपले जेवण सोडले नाही.



आर्टीने खेकड्याचे जेवण स्वतःकडे ओढले.

आर्टीने पूर्ण जोर लावून ते खेचले.त्याने खेकड्याला सुद्धा गोल-गोल फिरवलं.



यामुळे म्हाताऱ्या खेकड्याला चक्कर यायला लागली. त्याला आपले खाणे सोडून द्यावे लागले. चक्कर आल्यामुळे तो खूप वेळपर्यंत गोल गोल फिरावे लागले. मग तो तिथून खूप दूर गेला.





“आर्टी खूपच हुशार आणि शूर आहे.”
छोटे मासे सगळे मिळून ओरडले.
“बघा, तिने त्या मतलबी म्हाताऱ्या
खेकड्याला पळवलं!”

एक दिवस आर्टीने एक हुक बघितलं,
तो एका दोरीला लटकला होता.





पाण्याच्या वर एक मच्छीमाराने
त्या दोरीला पकडले होते.



वाह! त्या हुकाला एक स्वादिष्ट
गोष्ट लटकत होती.
आर्टी, पोहत तिथे गेली.

“नको ! नको !” लहान मासे ओरडले. “आर्टी, त्या हुकाजवळ बिलकुल जाऊ नकोस!”





पण आर्टी खूप हुशार होती. तिला न अडकता हुकाचे खाणे काढता येत होते. तिने तेच केले.

मग आर्टीने मच्छीमाराच्या
हुकाला काहीतरी अडकून पाठवले.





काही वेळानंतर हुक परत खाली आले. यावेळी त्याला एकदम मस्त पदार्थ अडकवलेला होता. आर्टीने तो पदार्थपण काढून खाल्ले.

“नको आर्टी! नको!” छोटे मासे ओरडले.
“त्या हुकाजवळ चुकुनही जावू नकोस.”



पण काय करायचे हे आर्टीला माहित होते.
तिने हुकाचे खाणे परत काढून घेतले.





आर्टीने मच्छीमारासाठी परत हुकाला काही अडकवले.

हुक परत वरती गेले. ते बघून छोटे मासे आश्चर्याने हसू लागले.



पण मच्छिमार हसला नाही.
तो तिथून निघून गेला.





“आर्टी, खरोखरच खूप हुशार आहे!”
“तिने मच्छिमाराला हाकलून दिले!
आर्टी, काहीही करू शकते!”



पण काही असे होते की जे आर्टी करू शकत नव्हती. आर्टीला फार वाटायचे की, तिने पाण्यात मोठा सूर मारावा.



पण ती छोटी होती, त्यामुळे ती छोटाच सूर मारू शकत होती.

पण आर्टीने आपले प्रयत्न सोडले नाही.
ती सारख्या उड्या मारतच राहिली.
मोठा सूर मारण्याचा प्रयत्न करत
राहिली. एक मोठा सूर
वो लगातार कूदती रही.





ती उड्या मारत राहिली, उड्या
मारत राहिली. पण ती केवळ
छोटे सूर मारू शकली.



एक दिवस आर्टीने म्हटले, “मला मोठा सूर मारण्यासाठी एका मोठ्या जागेवर जावे लागेल. त्यासाठी मी पोहत समुद्रात जाईन.”



“तू चुकुनही समुद्रात जाऊ नकोस. तिथे गेल्यावर तू परत येणार नाहीस,” छोटे मासे म्हणाले.

पण आर्टी पोहत पोहत समुद्रात गेली. तिथे मासे पकडणाऱ्या अनेक बोटी होत्या.







समुद्रात मासे पकडण्यासाठी जाळी अंथरलेली होती.



आर्टीला हे माहित नव्हतं की, समुद्राच्या आतल्या भागात व्हेल मासे असतात. तेव्हाच आर्टी जवळून एक व्हेल मासा गेला. तो एकदम भीमकाय – विशाल होता. वो एकदम भीमकाय - विशाल थी. त्याचे तोंड वाड्याच्या दरवाज्याइतके मोठे आणि उंच होते. त्याचे तोंड इतके रुंद होते की व्हेलला आर्टी दिसली सुद्धा नाही.

“मी जाळ्यात अडकणार नाही!” आर्टी म्हणाली. ती तर एक छोटा मासा होती. ती जाळ्यातून आत-बाहेर करू शकत असे. मग ती पोहत-पोहत समुद्राच्या आतल्या भागात पोहचली.



व्हेल पण पुढे गेला.
आर्टी पण पुढे गेली.
मग आर्टी, सरळ व्हेलच्या तोंडात
घुसली. आत खूप, गडद अंधार होता.
आर्टी, ला तिथे चांगले वाटले नाही.
“मी कुठे आहे?” तिने विचारले.
“हे सगळे काय आहे?
हे काय होत आहे?”





आर्टी गोल-गोल पोहू लागली.
ती इकडे-तिकडे, डावीकडे-उजवीकडे
पोहू लागली.

आर्टी उड्या मारू लागली आणि सूर मारू लागली. बलू – बलू – बलू - ती तोंडातून हवेचे बुडबुडे सोडू लागली.





तेव्हाच आर्टीची, व्हेलशी टक्कर झाली. धड़ाम! टक्कर!

धड़ाम! टक्कर!

सूर! सूर!

बलू – बलू – बलू -

व्हेलला काही समजेना, की त्याच्या आत हे काय होत आहे. यासगळ्या मुळे त्याला गुदगुल्या होत होत्या.





गुदगुल्यांमुळे व्हेलला जोरात हसू आले. काय हास्य होते ते!

व्हेलच्या हसण्यामुळे आर्ती जोराच्या झटक्याने आणि मोठा सूर मारून बाहेर आली.

“मी करू शकले! मी करू शकले!” आर्ती ओरडली. “मी व्हेल इतका मोठा सूर मारला!”



त्यानंतर आर्टी लवकर घरी परत आली.
ती छोट्या माशांना त्या सूर मारण्याबद्दल
तिला सगळं काही सांगायचं होतं.

अंत